महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी या विद्यापीठास सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) करीता अनुदान वितरीत करणेबाबत..(अनिवार्य)

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : मफुवि-१४२४/प्र.क्र.१७४/७अे,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २७.०२.२०२५.

**वाचा :-**
१. वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३, दि.०१.०४.२०२४.
२. वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि.२५.०७.२०२४.
३. कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र.संकिर्ण-१५१९/प्र.क्र.६५/६-अे,दि.२६.०६.२०२३.
४. कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र.मफुवि-१४२४/प्र.क्र.१७४/७-अे, दि.०६.०९.२०२५.
५. नियंत्रक, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी यांचे पत्र क्र.मफुकृवि/लेखा-२/९१९/२०२४. दि.२२.११.२०२४.
६. नियंत्रक, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी यांचे पत्र क्र.मफुकृवि/लेखा-२/१०४४/२०२४. दि.३०.१२.२०२४.

**प्रस्तावना:-**

सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरीता, वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्रमांक ०१ च्या परिपत्रकान्वये एप्रिल ते जुलै, २०२४ पर्यंतची मासिक विवरणपत्रे बीम्स प्रणालीवर प्रशासकीय विभागांकडून नोंदविण्यात आल्यानंतर विभागास आवश्यक असणारा अनिवार्य व कार्यक्रमावरील खर्चाचा निधी वित्त विभागामार्फत वितरीत करण्याबाबत सूचना निर्गमित केल्या होत्या. तसेच, संदर्भ क्र.०२ येथील परिपत्रकान्वये सन २०२४-२०२५ या आर्थिक वर्षाच्या प्रथम नऊमाहीकरीता (डिसेंबर, २०२४ अखेर) आवश्यक असणारा अनिवार्य व कार्यक्रमांतर्गत खर्चाचा अर्थसंकल्पीत निधी एकूण वार्षिक तरतूदीच्या ६० व ७० टक्केच्या मर्यादेत वितरीत करण्यास मान्यता देण्यात आली आहे.

नियंत्रक, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी यांनी उपरोक्त संदर्भ क्र.०५ व ०६ च्या पत्रान्वये राहुरी कृषि विद्यापीठास मागणी क्र. डी-३, २४१५-कृषि विषयक संशोधन व शिक्षण या मुख्य लेखाशिर्षाखालील ०१, पीकसंवर्धन (अनिवार्य) (२४१५ ००२५) व ०३, पशुसंवर्धन (अनिवार्य) (२४१५ ०१९७ ) ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) या बाबीकरीता निधी वितरणाचा प्रस्ताव सादर केला होता. त्यानुषंगाने, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी यांना मुख्य लेखाशिर्ष २४१५-कृषि विषयक संशोधन व शिक्षण, ०१ पीकसंवर्धन (२४१५ ००२५) व ०३-पशुसंवर्धन (२४१५ ०१९७) या लेखाशिर्षांतर्गत ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) करीता निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u> :-**

सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरीता, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी यांना मुख्य लेखाशिर्ष २४१५-कृषि विषयक संशोधन व शिक्षण, ०१ पीकसंवर्धन (२४१५ ००२५) या लेखाशिर्षांतर्गत ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) करीता रु.३०१.२८ लाख व ०३, पशुसंवर्धन (अनिवार्य) (२४१५ ०१९७ ) ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) या बाबीकरीता रु.७.६२ लाख असा एकूण रु.३०८.९० लाख (अक्षरी रु.तीन कोटी, आठ लाख, नव्वद हजार) पुढीलप्रमाणे वितरीत करण्यास शासन मंजुरी देत आहे.

(रुपये लाखात)

| अ. क्र. | अनिवार्य योजनेचे नाव | लेखाशीर्ष व उद्दीष्ट | सन २०२४-२५ करीता अर्थसंकल्पीय तरतूद | या शासन निर्णयाद्वारे वितरीत करावयाचे अनुदान |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १) | मागणी क्र. डी-३, १२०, इतर संस्थांना सहाय्य, (००)(०१) महात्मा फुले कृषि विद्यापीठाला सहायक अनुदान | ०१,पीकसंवर्धन (२४१५ ००२५) ३१,सहायक अनुदान (वेतनेतर) | ११५८.७५ | ३०१.२८ |
| २) | | ०३,पशुसंवर्धन (२४१५ ०१९७) ३१,सहायक अनुदान (वेतनेतर) | १२.७१ | ७.६२ |
| | **एकुण** | | **११७१.४६** | **३०८.९०** |

२. सदर शासन निर्णयातील अनुदान हे खालील नमूद अटी व शर्तीच्या अधीन राहून वितरीत करण्यात येत आहे.

१) वित्त विभागाच्या दि.०१.०४.२०२४ व दि.२५.०७.२०२४ च्या परिपत्रकामध्ये देण्यात आलेल्या सूचनांची काटेकोर अंमलबजावणी करण्यात यावी.

२) कृषि विद्यापीठांनी उपलेखाशिर्ष / गट / योजना आणि बाबनिहाय वितरीत केलेला निधी संबंधीत योजनेतील जी पदे / बाबी, योजनेतर योजना म्हणून पुढे चालू ठेवण्यास शासनाने मान्यता दिली आहे, त्या पदांचे वेतन व भत्ते आणि अनुज्ञेय बाबींसाठीच फक्त खर्च करावा.

३) उपलेखाशिर्षनिहाय, गटनिहाय, योजनानिहाय व बाबनिहाय वितरीत केलेला निधी कोणत्याही कारणास्तव अखर्चित / शिल्लक राहीला / राहणार असेल तर सदर अखर्चित / शिल्लक निधी शासनाचे मान्यतेशिवाय इतर गटांसाठी / योजनांसाठी / बाबींसाठी परस्पर वर्ग करु नये किंवा खर्च करु नये.

४) प्रत्येक उपलेखाशीर्ष / गट /योजना आणि बाब निहाय स्वतंत्र लेखे / हिशोब ठेवावेत.

५) कृषि विद्यापीठांना मंजूर केलेले सहाय्यक अनुदान, अनुदान सुत्राप्रमाणे बरोबर आहे किंवा कसे, तसेच, विहीत आदेश / कार्यपध्दतीनुसार खर्च करण्यात येत आहे किंवा कसे, याबाबत प्रत्येक आर्थिक वर्षाचा मुल्यमापन अहवाल शासनास संबंधित आर्थिक वर्ष समाप्त झाल्यापासून तीन महिन्यांच्या कालावधीत सादर करावा. तसेच, मागील आर्थिक वर्षाचा अखर्चित निधी किती आहे, हे तात्काळ शासनास कळवावे.

६) विद्यापीठांना मंजूर करण्यात आलेले अनुदान महाराष्ट्र कृषि विद्यापीठ अधिनियम १९८३, महाराष्ट्र कृषि विद्यापीठ परिनियम १९९०, आणि महाराष्ट्र कृषि विद्यापीठ लेखा संहिता १९९१ मधील तरतूदीप्रमाणे आणि प्रचलित शासन आदेश व विहित कार्यपध्दतीनुसार सक्षम अधिकाऱ्यांची प्रशासकीय व वित्तीय मान्यता घेतल्यानंतर विहीत मर्यादेत खर्च करण्यात यावे. केवळ अर्थसंकल्पीय तरतूद आहे किंवा अनुदान वितरीत केले आहे म्हणून खर्च करु नये.

७) नियमबाह्य योजना पदे आणि बाबींसाठी खर्च करु नये.

कृषि विद्यापीठाच्या नियंत्रक आणि इतर संबंधित सक्षम प्राधिकाऱ्यांनी उपरोक्त अटी व शर्तीचे काटेकोरपणे अनुपालन करावे.

**३.** याप्रित्यर्थ होणारा खर्च सन २०२४-२५ च्या अंदाजपत्रकात नमूद केलेल्या लेखाशीर्षाखाली मंजूर केलेल्या तरतूदीतून मासिक निधी विवरणपत्राच्या मर्यादेत भागवावा व त्याच लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

**४.** सहायक लेखाधिकारी, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी या आहरण व संवितरण अधिकारी यांनी संबंधित उपशीर्षातर्गत मंजूर केलेले अनुदान कृषि विद्यापीठांचे संबंधित नियंत्रक यांना अदा करण्याबाबत आवश्यक कार्यवाही करावी.

**५.** सदर आदेश महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिका (भाग-१) १९७७ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार तसेच, वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.२५०/२०२४/व्यय-१, दि.१२.०८.२०२४ देण्यात आलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

**६.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२५०२२७१७५३५७६१०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

UMESH NARAYAN CHANDIWADE

Digitally signed by UMESH NARAYAN CHANDIWADE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=0a3a08c7339c487fe2836238383bf91bbd037b93b4bdf6c8e95d1969e585fffe, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=CCBE80FCC6B64503B4E8B1269BD88D631F3F3C2BEF6E1CA70CC9A4E30954011F, cn=UMESH NARAYAN CHANDIWADE
Date: 2025.02.27 17:55:10 +05'30'

**( उमेश चांदिवडे )**
**अवर सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) महासंचालक, महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद,पुणे.

२) वित्तीय सल्लागार, महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद,पुणे.
३) कुलगुरु/कुलसचिव,महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी.
४) नियंत्रक, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी.
५) सहायक लेखाधिकारी, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी.
६) महालेखापाल, महाराष्ट्र १ / २ (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर.
७) जिल्हा कोषागार अधिकारी, अहमदनगर व उपकोषागार अधिकारी, अहमदनगर.
८) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई / निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
९) मुख्य लेखापरीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई.
१०) उप मुख्य लेखापरीक्षक (वरिष्ठ), स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई.
११) उप सचिव, वित्त विभाग (व्यय-१ / अर्थसंकल्प - १३), मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
१२) उप सचिव,कार्यासन १४३१, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
१३) उप सचिव, कार्यासन २अे, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
१४) कार्यासन ७-अे (निवडनस्ती), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.